E- Manas Software **खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०२१/प्र.क्र.२४९/आरोग्य ३अ

गो.ते.रुग्णालय संकुल, दहावा मजला, संकुल इमारत
मंत्रालय, मुंबई ४००००१
दिनांक : २८ मार्च, २०२२

**वाचा :-**

१) सह संचालक (असंसर्गजन्यरोग), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक : आआसे/माआ/टे-४/प/१०६०१-०४/२२ दिनांक १६.०३.२०२२

**प्रस्तावना :-**

मानसिक आरोग्य सेवा कायदा २०१७ (The Mental Health Care Act २०१७) च्या कायद्याची अमलबजावणी राज्यात करण्याची कार्यवाही सुरू आहे. या अनुषंगाने सदर कायदा महाराष्ट्र राज्यात लागू करणेकरीता E- Manas Software कार्यान्वित करणे आवश्यक बाब आहे. E- Manas हे सॉफ्टवेअर हे कर्नाटक राज्याने आय.आय.आय.टी., बेंगलोर व निमहान्स यांच्या सहकार्याने तयार केले असून, सदर सॉफ्टवेअर हे कर्नाटक राज्याकडून महाराष्ट्र राज्यासाठी आवश्यक ते बदल/Customization करण्यात येणार आहे. सदर Customization हे आय.आय.आय.टी. बेंगलोर यांच्यामार्फत करण्यात येणार आहे व त्याकरीता येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

E- Manas हे सॉफ्टवेअर करीता येणाऱ्या रु. १४.१६ लक्ष इतक्या खर्चाच्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर सॉफ्टवेअर करीता येणारा खर्च FMR Code १८.४.५ (Innovation under NMHP) मधील मंजूर अनुदान भागविण्यात यावा.

३. सदर सॉफ्टवेअर खरेदी /करार शासनाने विहित केलेल्या पध्दतीने करण्यात यावेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२८१७२३३९३९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c94703436c07cda664672d20607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b869fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2022.03.28 17:44:54 +05'30'

( प्र. मो. बलकवडे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १/ २, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक (१), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
४. सहसंचालक (असंसर्गजन्यरोग), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
५. कक्ष अधिकारी (ई-गव्हर्नन्स), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. निवडनस्ती (आरोग्य-३ अ ).